**मुंबई शहर भूमापन व भूमी अभिलेख विभागातील ४२ अस्थायी पदांना दिनांक ०१.०३.२०१७ ते दिनांक ३०.०९.२०१७ पर्यंत मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय, क्रमांक-एसआरव्ही-२०१६/प्र.क्र.२९९/ई-७**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक : २५ एप्रिल, २०१७

वाचा :-

१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र.संकीर्ण-१००४/प्र.क्र.८८/ल-१, दिनांक २८.०३.२००६.
२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. एस.आर.व्ही- २०१६/ प्र. क्र.२९९/ ई-७. दि. २४ ऑक्टोबर, २०१६.
३) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. पदनि २०१६/ प्र.क्र. ८/१६/ आ.पु.क. दि. १० फेब्रुवारी २०१७
४) जिल्हाधिकारी, मुंबई शहर यांचे क्र.आस्था/टे-२/सीएसएलआर/मुदतवाढ/फेरसादर- २०१७, दिनांक २२ मार्च, २०१७ चे पत्र.

**शासन निर्णय :-**

शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र.संकीर्ण-१००४/प्र.क्र.८८/ल-१, दिनांक २८.०३.२००६ अन्वये मुंबई शहर भूमापन व भूमी अभिलेख विभागातील पदांचा आकृतीबंध निश्चित करण्यात आलेला आहे.

२. जिल्हाधिकारी, मुंबई शहर यांच्या आस्थापनेवरील मुंबई शहर भूमापन व भूमी अभिलेख शाखेतील खालील ४२ अस्थायी पदांना उपरोक्त दिनांक २४.१०.२०१६ च्या शासन निर्णयान्वये दिनांक ०१.१०.२०१६ ते दिनांक २८.०२.२०१७पर्यंत मुदतवाढ देण्यात आलेली आहे. आता सदरहू खालील ४२ अस्थायी पदांना दिनांक ०१.०३.२०१७ ते दिनांक ३०.०९.२०१७ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | पदसंख्या |
|---|---|---|
| १ | सहायक संचालक, नगर रचना | ०१ |
| २ | सहायक अधीक्षक तथा नगर भूमापन अधिकारी | ०२ |
| ३ | सहाय्यक लेखा अधिकारी | ०१ |
| ४ | परिरक्षण भूमापक | ११ |
| ५ | वरिष्ठ आरेखक व आरेखक | ०७ |
| ६ | लघुलेखक (निम्नश्रेणी) | ०१ |
| ७ | वरिष्ठ लिपीक | ०२ |
| ८ | वरिष्ठ बांधणीकार | ०१ |
| ९ | वाहन चालक | ०१ |
| १० | दप्तरबंद | ०१ |
| ११ | खलाशी | ०९ |
| १२ | शिपाई | ०५ |
| | **एकूण पदे :-** | **४२** |

३. उपरोक्त ४२ पदांपैकी एकही पद सहा महिन्यांपेक्षा अधिक कालावधीकरिता रिक्त नव्हते वा व्यपगत झालेले नाही, तसेच एकही पद कमी करण्यात आलेले नाही या अटीच्या अधिन राहून उक्त अस्थायी पदांना मुदतवाढ देण्यात येत आहे.

४. यावर होणारा खर्च “मागणी क्रमांक सी-१, २०२९-जमीन महसूल-१०३ भूमी अभिलेख-१०३(०१)(०३) जिल्हाधिकारी, मुंबई (२०२९ ०७५२)” या लेखशिर्षाखाली खर्ची टाकून वित्तीय वर्ष २०१७-२०१८ खाली मंजूर अर्थसंकल्पीय अनुदानातून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क, दिनांक १०.०२.२०१७ या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०४२५१४४८५२०११९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Santosh Haridasrao Bhogle

Digitally signed by Santosh Haridasrao Bhogle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cfe36679ae12922422bc5e7f7d277841f1fe67725f465c272fd6727259260b3d, cn=Santosh Haridasrao Bhogle
Date: 2017.04.25 14:50:44 +05'30'

**( डॉ. संतोष भोगले )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) जिल्हाधिकारी, मुंबई शहर, जुने जकात घर, फोर्ट, मुंबई ४००००१.
२) जमाबंदी आयुक्त व संचालक, भूमी अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३) विभागीय आयुक्त, कोंकण विभाग, कोंकण भवन, नवी मुंबई.
४) महालेखापाल, महाराष्ट्र १ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.
५) महालेखापाल, महाराष्ट्र १ (लेखा परीक्षा), मुंबई.
६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७) संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८) वित्त विभाग, कार्यासन व्यय-९/वित्तीय सुधारणा-१, मंत्रालय, मुंबई.
९) कार्यासन अधिकारी, कार्यासन ब-१, ल-१, ई-६, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
१०) निवड नस्ती, कार्यासन/ई-७, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०००३२.